# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग

शासन निर्णय, क्रमांक-पमुवा-३००२/३८/३/पीआरएस-१,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक :- १९, मार्च, २००२.

**वाचा** :- १) शासन निर्णय, क्र.पमुवा-३००२/३८/३/पीआरएस-१, दिनांक.२९.१.२००२

२) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र अ.शा.क्रमांक सीटीई/अपदे/२००२-२००३/कक्ष १(५), दिनांक ८.२.२००२

**शासन निर्णय** :- कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील राजपत्रित व अराजपत्रित पदांना दिनांक २८.२.२००२ पर्यंत शासन निर्णय, क्र.पमुवा-३००२/३८/३/पीआरएस-१,दिनांक २९.१.२००२ च्या सोबतच्या सहपत्रातील परिशिष्ट "अ" (पृ.१-२१) वरील उल्लेखिलेल्या अशा एकूण १३२१ अस्थायी पदांना चालू ठेवण्यास मान्यता देण्यात आली होती. तरी सदर सर्व अस्थायी पदांना दि.१.३.२००२ ते ३०.४.२००२ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

२. कारागृह महानिरीक्षक, पुणे यांच्या आस्थापनेवरील सदरील अस्थायी पदांच्या आढाव्याचे काम दिनांक ३०.४.२००२ पर्यंत पूर्ण करून त्याचा अहवाल वित्त विभागास पाठविण्यासाठी शासनास सादर करावा. तसेच पदे कारागृह विभागातील कार्यकारी स्वरुपाची पदे वगळता प्रस्तावातील कोणतीही पदे सहा महिन्यांपेक्षा अधिक काळ रिक्त असल्यास वगळण्यात यावे. या अटीच्या अधीन राहून कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्या आस्थापनेवरील एकूण १३२१ अस्थायी पदांना उक्त नमूद केल्याप्रमाणे शासन मंजूरी देण्यात येत आहे.

३. याबाबत होणारा खर्च "२०५६-तुरुंग" या अर्थसंकल्पीय लेखाशिर्षाखाली खर्ची टाकून त्या लेखाशिर्षाखालील सन २००२-२००३ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

GR-20020415125930000-0200

हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.सीआर-२२२/२००२/
व्यय-८, दिनांक २२.२.२००२ अन्वये दिलेल्या मंजुरीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( वर्षा पगारे )
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

(१) कारागृह महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, पुणे.
(२) कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे/ पुर्व विभाग, नागपूर / मध्य विभाग, औरंगाबाद / दक्षिण विभाग, मुंबई .
(३) सर्व अधिक्षक, मध्यवर्ती कारागृह / जिल्हा कारागृह.
(४) प्राचार्य, तुरुंगाधिकारी, प्रशिक्षण शाळा, येरवडा, पुणे-६.
(५) प्राचार्य, किशोर सुधारालय, नाशिक.
(६) संपर्क अधिकारी, स्वतंत्रपूर कॉलनी, आटपाडी, जि.सांगली/चंद्रपूर, जि.कारागृह.
(७) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), मुंबई / नागपूर.
(८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई .
(९) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
(१०) वित्त विभाग / व्यय-८.
(११) पीयुर्डी-१, गृह विभाग,
(१२) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
(१३) निवडनस्ती, पीआरएस-१.

GR- 20020415125930000-0200